**राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग यांना "विभागप्रमुख" घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८९/सहा,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. १९ नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावनाः-**

केंद्र शासनाच्या माहिती अधिकार अधिनियम २००५ च्या कलम १५ मधील तरतूदीनुसार राज्य शासनाकरीता दि.११.१०.२००५ च्या शासन निर्णयान्वये राज्य माहिती आयोग या कार्यालयाची स्थापना करण्यात आली आहे. माहिती अधिकार अधिनियमातील कलम १६(५)(क) अन्वये मुख्य माहिती आयुक्त यांना मुख्य निवडणूक आयुक्तांप्रमाणे वेतन व भत्ते आणि सेवेच्या इतर अटी व शर्ती असतील अशी तरतूद करण्यात आली आहे. मुख्य निवडणुक आयुक्त यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात आले असल्याने राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम,१९८१ मधील नियम ९(२२) अन्वये "विभाग प्रमुख"म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१६१११९११२६१०९५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Gopalkrishna Gaikwad
Digitally signed by Rajendra Gopalkrishna Gaikwad
Date: 2016.11.19 11:30:39 +05'30'

**( रा.गो.गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव राज्य माहिती आयोग,मुंबई.
२) महालेखापाल-१/२(लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) उपसचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, अमरावती/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/नवी मुंबई/ बृहन्मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कोषागार अधिकारी, अमरावती/पुणे/नागपूर/ /औरंगाबाद/नाशिक/नवी मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
८) वित्त विभाग कार्यासन सेवा ३/सेवा ४/सेवा ५/विनिमय.
९) निवडनस्ती कार्यासन सहा.